**कडवा प्रकल्प, ता.इगतपूरी**
**जि.नाशिक**
**तृतिय सुधारित प्रशासकीय**
**मान्यता प्रदान**
**करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
जलसंपदा विभाग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
शासन निर्णय क्रमांक : कडवा/०७०९/प्र.क्र/(३७९/०९) मोप्र-१
दिनांक ३१.८.२००९

**संदर्भ :** (१) शासन निर्णय क्र.कडवा/केअआर/१०७७/७१०/(१११०) जसंअ-१, दि.९.७.१९७९
(२) शासन निर्णय क्र.कडवा/केअआर/१०९२/६८५/९२/मोप्र-१, दि.२५.१.१९९४
(३) शासन निर्णय क्र.कडवा/१०९६/सा-३३६८/(७८०/९६) मोप्र-१, दि.९.७.१९९९

**प्रस्तावाना :-**

नाशिक जिल्हयातील कडवा प्रकल्पास संदर्भ क्रमांक १ शासन निर्णयाव्दारे रुपये ८१४ लक्ष इतक्या रक्कमेस मुळ प्रशासकीय मान्यता देण्यांत आली होती. त्यानंतर काही महत्वाच्या तांत्रिक बदलांना शासनाने मान्यता दिली. उदा. मुळ संकल्पलाप्रमाणे दरवाजा विरहीत सांडवा ऐवजी दरवाजायुक्त सांडवा तसेच सिंचन विमोचकाऐवजी विद्युत विमोचकास मान्यता तसेच केंद्रीय जल आयोगाच्या शे-याप्रमाणे पर्यावरण बाबींविषयीचा अंतर्भाव अंदाजपत्रकात करुन पहिला प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता रुपये ४३६०.३७ लक्ष इतक्या रकमेस मान्यता देण्यांत आली.

दरम्यानच्या काळात दरसूचीत वाढ, इंधन व दरवाहतुकीच्या दरात मोठी वाढ झाल्यामुळे त्याचप्रमाणे लाभक्षेत्र विकासाची कामे समाविष्ट केल्यामुळे व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता संदर्भ क्रमांक २ अन्वये रुपये ७६०६.५६ लक्ष इतक्या रक्कमेस देण्यात आली.

तद्नंतर संपूर्ण कालवा व धरणाचे कामे पूर्ण झाल्यानंतर १९९९ पासून (काही वितरीका अपूर्ण व भाग १ ची कामे अपूर्ण) सिंचन होत आहे. परंतु अभ्यासाअंती असे निदर्शनास आले आहे की, अस्तित्वातील कालव्यास दिलेला उतार व वापरलेले **N** ची

किंमत व १९७२ परिपत्रकाप्रमाणे व्यहनव्य ही अपूर्ण असल्याने कालव्याचा पूर्ण संकल्पित वहन होत नसल्याचे आढळून आलेले आहे. त्याचप्रमाणे कालव्याची कामे रोजगार हमीवर मोनो झोन काटछेद झाल्याने व त्याचप्रमाणे मुरुमाळ भागातून कालवा जात असल्याने, कि.मी.६० ते ८८ मधील लांबीत संकल्पीत विसर्ग मिळत नसल्याने, प्रकल्पिय सिंचनावर परिणाम झालेला आहे. सिंचनासाठी आवश्यक असलेला विसर्ग उपलब्ध होणे व शासन आदेशप्रमाणे पाणी पुरवठ्यासाठी (कि.मी.७२) पाणी विमोचकाव्दारे देऊन सर्व एकत्रित विसर्ग मिळणेसाठी कालव्याची वहन क्षमता २४४ क्युसेक्स ऐवजी ४०२ क्युसेक्स बदल केलेला आहे. एकंदरीत वहनक्षमता वाढीमुळे कालवा मातीकाम व बांधकामात काही प्रमाणात बदल करावा लागणार असल्याने मंजूर सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त अहवालामधील उर्वरित रक्कम पुरेशी नसल्याने तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता घेणे आवश्यक झालेले आहे. सदर उर्वरित कामासाठी रु.६१८४.३८ लक्ष खर्च अपेक्षित आहे. त्यामुळे कडवा प्रकल्पास तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :-

कडवा प्रकल्प, ता.इगतपूरी, जि.नाशिक या योजनेला एकूण अंदाजपत्रकीय किंमत सन २००८-०९ दरसूचीनुसार १४२.२१ कोटी आहे. कामाप्रित्यर्थ ११५.८६ कोटी आणि अनुषंगिक खर्चासाठी २६.३५ कोटी रक्कमेच्या प्रकल्प अहवालास खालील अटींच्या अधिन राहून तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यांत येत आहे.

कडवा प्रकल्पाच्या कालव्याच्या एकूण लांबीत जेथे जेथे जळती / झिरपांचे प्रमाण जास्त आहे तेथील आवश्यक लांबीतच उपाययोजना करण्यात यावी त्यासाठी मुख्य अभियंता, अधीक्षक अभियंता यांनी प्रत्यक्ष कालव्यातील गळतीची (Identification) पहाणी करुन गळतीची कारणमिमांसा शोधून ठोस उपाययोजन निश्चित करुन प्रस्तावास तांत्रिक मान्यता द्यावी.

२. सदर प्रकल्प अहलवात नमुद केलेल्या कालावधीत कडवा प्रकल्पाची कामे पुर्ण करावयाची आहेत.

३. कडवा प्रकल्पाचे तृतीय सुधारित अंदाजपत्रकीय खर्च रुपये १४२२१.८१ लक्ष असल्याने सन १९९९ मध्ये मिळालेल्या व्दितीय सुधारित मान्यता प्राप्त ७६०६.५६

लक्ष या अंदाजित किंमतीच्या तुलनेत ६६१५.२५ लक्ष वाढीव खर्च उद्‌भवणार असून त्यांस मान्यता देण्यात येत आहे.

४. उपरोक्त सुधारित अंदाजित खर्चाची शीर्षनिहाय व उपशिर्षनिहाय विवरण सोबत जोडलेल्या तीन परिशिष्टात (परिशिष्ट अ ते क) दर्शविण्यात येत आहे.

५. या कामावरील खर्च ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधा-यावरील भांडवली खर्च १९० सार्वजनिक व इतर उपक्रमातील गुंतवणूक (०२) योजनांअंतर्गत (२) (३) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान ४७०१ या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व त्याखालील मंजूर अंशदानातून भागविण्यात यावा.

६. कडवा प्रकल्पावरील खर्च या प्रकल्पाच्या व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त किंमतीच्या मर्यादेत असतानाच तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेकरीता प्रस्ताव शासनास प्राप्त झाला असून सुधारित अंदाजानंतर सुध्दा प्रकल्प विहित मापदंडात बसत आह. तसेच वित्त विभागाच्या सहमतीने निर्गमित केलेल्या शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-१०९९/(१२६/९९) मोप्र(प्र) दिनांक १८.५.९९ मधील अ अंतर्गतच्या तरतूदीप्रमाणे कडवा प्रकल्पास तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याकरिता जलसंपदा विभाग सक्षम आहे. या पार्श्वभूमीवर सदर आदेश आंतरवित्त सल्लागार व सहसचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. प्रकल्पाची सुधारित किंमत अर्थसंकल्पिय अधिवेशनामध्ये विधीमंडळाच्या निदर्शनास आणण्याची कार्यवाही स्वतंत्रपणे करण्यांत येईल.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २००९०८३१२१२५५१००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

सोबत : शिर्षनिहाय अपेक्षित खर्चाचे विवरणपत्र .

**( प्र.म.अबनावे )**
शासनाचे उप सचिव

प्रत सहपत्रासह :-

महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
स्वीय सहायक, मा.मंत्री (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, मा.राज्यमंत्री (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

स्वीय सहायक, सचिव (जलसंपदा) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

कार्यकारी संचालक, गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद

मुख्य अभियंता (दवप्र) व सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

मुख्य अभियंता (उमप्र) गोदावरी मराठवाडा पाटबंधारे विकास महामंडळ, नाशिक

आंतर वित्त सल्लागार, सहसचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

उपसचिव (मोप्र-१) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

उपसंचालक, माहिती व जनसंपर्क, संचालनालय, मंत्रालय, मुंबई यांना योग्य त्या प्रसिध्दीसाठी (२ प्रती)

अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण अहमदनगर

अवर सचिव (मोप्र-१), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

जिल्हाधिकारी, जि.नाशिक / अहमदनगर

उप अभियंता (मोप्र-१) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

कार्यासन :- निवसं-१/अर्थसकल्प-१/अर्थसंकल्प-२/लाक्षेवि (कामे) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई

मोप्र-१ कार्यासन, संग्रहार्थ.

मोप्र-१ कार्यासन निवडनस्ती.

# परिशिष्ट - अ

## शासन निर्णय क्रमांक : कडवा/०७०९/(प्र.क्र.३७९:०९) मोप्र-१, दिनाक ३१.८.२००९

## कडवा मोठा प्रकल्प, जिल्हा नाशिक

## तृतीय सुधारित प्रशासकीय प्रकल्प संकलित गोषवारा

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | उपशिर्ष | किंमत धरण | कालवा | एकूण |
|---|---|---|---|---|
| १. | ए-प्राथमिक | ६.९५ | २९.८५ | ३६.८० |
| २. | बी-जमीन | ३६५.९२ | ६२६.५५ | ९९२.४७ |
| ३. | सी-कामे | --- | ७४६.५५ | ७४६.५५ |
| ४. | डी-विमोचक | १५०७.४४ | --- | --- |
| ५. | ई-प्रपात | --- | --- | --- |
| ६. | एफ-मो-यांची कामे | --- | १७०१.०१ | १७०१.०१ |
| ७. | जी-पूल | --- | ५९८.७० | ५९८.७० |
| ८. | एच-अतिवाहक | --- | १४.३६ | १४.३६ |
| ९. | के-इमारत | ३०.३४ | ९६.७८ | १२७.१२ |
| १०. | एल-मातीकाम | --- | २५४४.४१ | २५४४.४१ |
| ११. | एम-वृक्षारोपण | ३.७० | ८.३९ | १२.०९ |
| १२. | ओ-संकीर्ण | १०९.२५ | १३२.२३ | २४१.४८ |
| १३. | पी-देखभाल | १६.४८ | १५२.१५ | १६८.६३ |
| १४. | क्यु-हत्यारे अवजारे | २०.३० | ४०.९१ | ६१.२१ |
| १५. | आर-दळणवळण | ४६.५२ | १.५४ | ४८.०६ |
| १६. | यु-वितरिका | --- | १९१७.६० | १९१७.६० |
| १७. | व्ही-लाभक्षेत्र विकास | --- | ८२०.२१ | ८२०.२१ |
| १८. | एक्स-पर्यावरण | --- | ७.८५ | ७.८५ |
| १९. | वाय-सामुग्री नुकसान | --- | ४०.५९ | ४०.५९ |
| | **एकूण** | **२१०६.९०** | **९४७९.६८** | **११५८६.५८** |

# परिशिष्ट - ब

## शासन निर्णय क्रमांक : कडवा/०७०९/(प्र.क्र.३७९:०९) मोप्र-१, दिनाक ३१.८.२००९

## कडवा मोठा प्रकल्प, जिल्हा नाशिक

## तृतीय सुधारित प्रशासकीय अहवाल

**शिर्षनिहाय किंमत दर्शविणारा तक्ता.**

**(रुपये लक्ष)**

| अ.क्र. | बाब | व्दितीय सुधारित प्रशासकीय मान्यतेप्रमाणे किंमत | तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यतेप्रमाणे किंमत | वाढ |
|---|---|---|---|---|
| १ | मुख्य शिर्षकाम | २०४५.४४ | २१०६.९० | ६१.४६ |
| २. | कालवे | ३६७३.८ | ७५६२.०८ | ३८८८.२० |
| ३. | अनुषंगिक खर्च | ८५१.४४ | २६३५.२३ | १७८३.७९ |
| ४. | वितरिका | १०३५.८० | १९१७.६० | ८८१.८० |
| ५. | प्रकल्पाची अंदाजपत्रकीय किंमत | ७६०६.५६ | १४२२१.८१ | ६६१५.२५ |
| ६. | दरसूची | १९९७-१९९८ | २००८-२००९ | ----- |

**परिशिष्ट-क**

**शासन निणय क्रमांक कडवा/०७०९/प्र.क्र.३७९/०९/मोप्र-१, दिनांक ३१/८/२००९ चे सहपत्र**

**कडवा मोठा प्रकल्प, जि. नाशिक.**

**तृतीय सुधारित प्रशासकीय अहवाल, संकलित गोषवारा**

| **अ.क्र.** | **बाब** | **रक्कम** |
|---|---|---|
| **अ** | प्रत्यक्ष खर्च | -- |
| | मुख्य शिर्षकाम | २१०६.९० |
| | कालवे | ७५६२.०८ |
| | वितरिका | १९१७.६० |
| | एकूण | ११५८६.५८ |
| **ब** | आस्थापना खर्च २० टक्के (ब जमिनग्रहण येणारी किंमत वगळूण) ११५८६.५८-९९२.४७) | २११८.६२ |
| | यंत्रसामुग्री ३.५० टक्के (ब. जमिन वगळून) ११५८६.५८-९९२.४७ | ३७०.७९ |
| | रजा व भविष्यनिर्वाह खर्च (०.२५ टक्के आस्थापना खर्च) (२११८.६२ x 0.25) | ५.२९ |
| | संग्रहवरील तूट (०.२५ टक्के) अ. प्राथमिक व जमिन क इमारती वगळूण) | २७.२९ |
| | एकूण | २५२१.१९<br>१४१०७.७७ |
| **क** | वजा | |
| | मुख्य लेखावरील अ ब व क वजा करुन | |
| | वैयक्तिक वाहन वगळून येणाऱ्या रक्कमेवर ७५ टक्के (५८.२१) | ४३.६५ |
| | वैयक्तिक वाहनावर २० टक्के दराने ३.२०) | ०.६० |
| | तात्पुरत्या इमारतीवरील किंमतीवर परतावा १५ टक्के दराने (०.१५ x 52.43) | ७.८६ |
| | | ५२.११ |

| | | |
|---|---|---|
| **ड** | अप्रत्यक्ष खर्च | |
| | १. जमिनीवरील महसूलवरील भांडवली खर्च ५ टक्के दराने (९९२.४७ X ०.५ | ४९.६२ |
| | २. लेखा परिक्षण खर्च (ब. जमिनी वगळून येणाऱ्या प्रत्यक्ष कामाच्या खर्चावर १ टक्का | १०५.९४ |
| | ३. सचिवालय खर्च (आस्थापना ०.५ टक्के) | १०.५९ |
| | | १६६.१५ |
| | **एकूण** | **१४२२१.८१** |